**राज्यातील नोंदणीकृत सहकारी गृहनिर्माण संस्थांना येणाऱ्या अडचणी सोडविण्यासाठी जिल्हा स्तरावर स्थापन करण्यात आलेल्या तक्रार निवारण समिती मध्ये संबंधित को ऑपरेटिव हौसिंग फेडरेशन (सहकारी गृहनिर्माण संस्थेचा महासंघ)च्या प्रतिनिधीचा समावेश करण्याबाबत.**



**महाराष्ट्र शासन**

**सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग**

**शासन निर्णय क्र.सगृयो-२०२३/प्र.क्र.१९२/१४-स,**

नवीन प्रशासन भवन, १४ वा मजला, मादाम कामा मार्ग,

हुतात्मा राजगुरु चौक,मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.

दि. ७/६/२०२३

**संदर्भ-** १)शासन निर्णय गृहनिर्माण विभाग क्र. संकिर्ण २०१९/प्र.क्र.१०/दुवपु-१, दि.१३/९/२०१९

**प्रस्तावना-**

सहकारी गृहनिर्माण संस्थांच्या सहकार परिषदेत मा. उप मुख्यमंत्री तथा मंत्री (गृहनिर्माण) यांनी सहकारी गृहनिर्माण संस्थांच्या कामकाजामध्ये गतिमानता व पारदर्शकता आणण्याच्या दृष्टीने काही महत्वाच्या घोषणा केल्या आहेत. त्यामध्ये सहकारी गृहनिर्माण संस्थांचा स्वयंपुनर्विकास हा एक अत्यंत महत्वाचा मुद्दा आहे.यापूर्वी गृह निर्माण विभागाने राज्यातील नोंदणीकृत सहकारी गृहनिर्माण संस्थांच्या स्वयंपुनर्विकासाला चालना देण्याच्या दृष्टीने द्यावयाच्या सवलतीबाबत राज्य मंत्रीमंडळाच्या दिनांक ०८/०३/२०१९ च्या बैठकित निर्णय घेण्यात आला होता. त्यानुसार गृहनिर्माण विभागाने दिनांक १३.०९.२०१९ रोजी शासन निर्णय निर्गमित केला आहे. यामध्ये राज्यातील नोंदणीकृत सहकारी गृहनिर्माण संस्थांना येणाऱ्या अडचणी सोडविण्यासाठी जिल्हा स्तरावर तक्रार निवारण स्थापन करण्याची तरतूद करण्यात आली आहे. त्यामध्ये मा.उप मुख्यमंत्री तथा मंत्री (गृहनिर्माण ) यांनी घोषणा केल्याप्रमाणे को ऑपरेटिव हौसिंग फेडरेशनच्या (सहकारी गृहनिर्माण संस्थांचा महासंघ) प्रतिनिधींचा समावेश करण्याची बाब शासनाच्या विचाराधिन होती.

**शासन निर्णय**

संदर्भाधीन दि.१३.०९.२०१९ च्या शासन निर्णयातील परिच्छेद १७ नुसार राज्यातील नोंदणीकृत सहकारी गृहनिर्माण संस्थांना स्वयंपुनर्विकास करताना येणाऱ्या विविध प्रकारच्या अडचणी / तक्रारी /

आक्षेप सोडविण्यासाठी प्रत्येक जिल्ह्याच्या स्तरावर एक तक्रार निवारण समिती गठित करण्यात आली आहे.सदर समितीमध्ये शासन निर्णयामध्ये नमूद इतर प्रतिनिधींसोबतच त्या जिल्ह्यातील को ऑपरेटिव हौसिंग फेडरेशनच्या (सहकारी गृहनिर्माण संस्थांचा महासंघ) एका सदस्याचा समावेश करण्यात येत आहे.सदर फेडरेशन प्रतिनिधींची निवड फेडरेशनने ठराव करून करावी.जिल्हा उपनिबंधक यांनी सदर नामनिर्देशन  झालेल्या फेडरेशन सदस्याचा अंतर्भाव तक्रार निवारण समितीमध्ये करून घेण्याची दक्षता घ्यावी.

०२. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२३०६०७१६४७४६९८०२ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने

NITIN VASANTRAO GAIKWAD

Digitally signed by NITIN VASANTRAO GAIKWAD
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=COOPERATION MARKETING AND TEXTILE DEPARTMENT, 2.5.4.20=5892c3fd8686c1921e784a3faa9888d155b03f5591ce11b21a1b5006247f6972, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=2276AC762AF372D872C2F01D5BB5086166F4A6E20A1BDF9762D556A93F5D118E, cn=NITIN VASANTRAO GAIKWAD
Date: 2023.06.07 17:43:01 +05'30'

**(नितीन गायकवाड )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत माहिती व उचित कार्यवाहीसाठी-**

१)मा.मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव,मंत्रालय,मुंबई
२)मा.उपमुख्यमंत्री यांचे सचिव,मंत्रालय,मुंबई
३)मा.मंत्री(सहकार) यांचे खाजगी सचिव,मंत्रालय,मुंबई
४)मा.विरोधी पक्ष नेता(विधानसभा/विधानपरिषद),मंत्रालय,मुंबई.
५)अपर मुख्य सचिव,नगर विकास विभाग(नवि-१/नवि-२)मंत्रालय,मुंबई
६) अपर मुख्य सचिव,महसूल व वन विभाग,मंत्रालय,मुंबई.
७) अपर मुख्य सचिव,गृहनिर्माण विभाग,मंत्रालय,मुंबई.
८) सहकार आयुक्त व निबंधक सहकारी संस्था,महाराष्ट्र राज्य,पुणे.
९) आयुक्त, बृहन्मुंबई महानगरपालिका.
१०) सर्व जिल्हा उपनिबंधक सहकारी संस्था.
११)निवडनस्ती.